**वेठबिगार कामगार पुनर्वसन केंद्रस्तरीय योजना २०२१ मधील तरतूदीनुसार निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पूरक -२०२४/प्र.क्र.०७/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २० ऑगस्ट, २०२४

वाचा -

१) उप संचालक, श्रम व रोजगार मंत्रालय, भारत सरकार यांचे कार्यालयीन ज्ञापन एफ. क्र. एस-११०१२/०१/२०१९-बीएल, दि. ०७.०२.२०२२
२) जिल्हाधिकारी, सोलापूर यांचे जा.क्र. २०२४/डीसीबी-२/आर आर-१३३२/२४, दि. ०६.०३.२०२४ रोजीचे पत्र
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्र. साशा १//कावि./१/१/१९३२७७९/२०२४, दि. १४.०५.२०२४ रोजीचे पत्र
४) जिल्हाधिकारी, पालघर यांचे यांचे दि. १६.०७.२०२४ रोजीचे पत्र
५) अपर जिल्हादंडाधिकारी, ठाणे यांचे क्र. गृह/क-१/टे-४/वेठबिगार/कावि-०४०७/२०२४, दि. १९.०७.२०२४ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

वेठबिगार कामगार पुनर्वसन केंद्रस्तरीय योजना २०२१ मधील मुद्दा क्र. १ (VII) नुसार प्रत्येक जिल्हा स्तरावर "वेठबिगार कामगार पुनर्वसन निधी (संचित निधी)" गठीत करावयाचा आहे. त्यानुसार जिल्हा स्तरावर सदर "वेठबिगार कामगार पुनर्वसन निधी (संचित निधी)" गठीत करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत. तसेच केंद्रीय वेठबिगार कामगार पुनर्वसन योजना, २०२१ मधील तरतूदीनुसार ठाणे, पालघर, अहमदनगर व सोलापूर जिल्ह्यातील मुक्त करण्यात आलेल्या वेठबिगार कामगारांना आर्थिक सहाय्य देण्यासाठी संदर्भाधीन क्र. २ ते ५ येथील पत्रांन्वये शासनाकडे निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी करण्यात आली आहे. त्यानुषंगाने निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

वेठबिगार कामगार पुनर्वसन केंद्रस्तरीय योजना २०२१ मधील मुद्दा क्र. १ (VII) नुसार जिल्हा स्तरावर "वेठबिगार कामगार पुनर्वसन निधी (संचित निधी)" गठीत करण्यासाठी पुढील तक्त्यात नमूद २५ जिल्ह्यांकरिता प्रत्येकी रूपये ५.०० लक्ष तसेच केंद्रीय वेठबिगार कामगार पुनर्वसन योजना, २०२१ मधील तरतूदीनुसार ठाणे, पालघर, अहमदनगर व सोलापूर जिल्ह्यातील मुक्त करण्यात आलेल्या वेठबिगार कामगारांना आर्थिक सहाय्य देण्यासाठी अनुक्रमे रूपये ३०.०० लक्ष, रूपये ४०.०० लक्ष, रुपये ५२.०० लक्ष व रूपये ९.०० लक्ष, अशी एकूण रुपये २५६.०० लक्ष एवढा निधी पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार सन २०२४-२०२५ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | वितरीत करावयाचा निधी | संबंधित महसूल विभाग |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | ३०.०० | कोकण |
| २ | पालघर | ४०.०० | कोकण |
| ३ | रत्नागिरी | ५.०० | कोकण |
| ४ | सिंधुदुर्ग | ५.०० | कोकण |
| ५ | अहमदनगर | ५२.०० | नाशिक |
| ६ | धुळे | ५.०० | नाशिक |
| ७ | जळगाव | ५.०० | नाशिक |
| ८ | नंदुरबार | ५.०० | नाशिक |
| ९ | सोलापूर | ९.०० | पुणे |
| १० | कोल्हापूर | ५.०० | पुणे |
| ११ | सांगली | ५.०० | पुणे |
| १२ | सातारा | ५.०० | पुणे |
| १३ | छत्रपती संभाजीनगर | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १४ | बीड | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १५ | जालना | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १६ | लातूर | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १७ | परभणी | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १८ | हिंगोली | ५.०० | छत्रपती संभाजीनगर |
| १९ | अमरावती | ५.०० | अमरावती |
| २० | अकोला | ५.०० | अमरावती |
| २१ | बुलढाणा | ५.०० | अमरावती |
| २२ | यवतमाळ | ५.०० | अमरावती |
| २३ | वाशिम | ५.०० | अमरावती |
| २४ | नागपूर | ५.०० | नागपूर |
| २५ | वर्धा | ५.०० | नागपूर |
| २६ | भंडारा | ५.०० | नागपूर |
| २७ | गोंदिया | ५.०० | नागपूर |
| २८ | गडचिरोली | ५.०० | नागपूर |
| २९ | चंद्रपूर | ५.०० | नागपूर |
| | **एकूण** | **२५६.००** | |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार विभागीय आयुक्त, कोकण यांना रुपये ८०.०० लक्ष, विभागीय आयुक्त, नाशिक यांना रुपये ६७.०० लक्ष, विभागीय आयुक्त, पुणे यांना २४.०० लक्ष, विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांना रुपये ३०.०० लक्ष, विभागीय आयुक्त, अमरावती यांना रुपये २५.०० लक्ष व विभागीय आयुक्त, नागपूर यांना रुपये ३०.०० लक्ष असा एकूण रूपये २५६.०० लक्ष एवढा निधी BEAMS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. यासाठी प्रत्येक महसुली विभागासाठी संबंधित विभागीय आयुक्त यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे. विभागीय आयुक्त यांनी या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबधित जिल्हाधिकारी यांना अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा. विभागीय आयुक्तांकडून निधी प्राप्त होताच संबंधित जिल्हाधिकारी यांनी जिल्हा स्तरावर "वेठबिगार कामगार पुनर्वसन निधी (संचित निधी)" गठीत करावा.

४. विभागीय आयुक्तांकडून निधी प्राप्त होताच जिल्हाधिकारी, ठाणे, पालघर, अहमदनगर व सोलापूर यांनी मुक्ती प्रमाणपत्र दिलेल्या वेठबिगार कामगारांना प्रत्येकी रुपये ३०,०००/- आर्थिक सहाय्यता निधी विहित कार्यपद्धतीनुसार वितरित करण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करावी. तसेच मुक्ती प्रमाणपत्र दिलेल्या वेठबिगार कामगारांना आर्थिक सहाय्य केल्यानंतर शिल्लक राहिलेला निधी जिल्हा स्तरावर गठीत "वेठबिगार कामगार पुनर्वसन निधी (संचित निधी)" मध्ये जमा करावा. जेणेकरून भविष्यात आढळून येणाऱ्या व मुक्ती प्रमाणपत्र दिल्या जाणाऱ्या वेठबिगार कामगारांना तातडीने आर्थिक सहाय्य करणे शक्य होईल.

५. **मुक्त करण्यात आलेल्या वेठबिगारांना अंतिम आर्थिक सहाय्य करताना वेठबिगार कामगार पुनर्वसन केंद्रस्तरीय योजना, २०२१ मध्ये नमूद सर्व अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याची खातरजमा करण्यात यावी व ज्या प्रकरणी अटी व शर्ती पूर्ण होत नसतील त्या प्रकरणी अटी व शर्तीच्या पूर्ततेनंतरच संबंधितांना आर्थिक सहाय्य करण्याबाबत दक्षता घेण्यात यावी. सदर प्रकरणी वेठबिगार कामगार पुनर्वसन केंद्रस्तरीय योजना, २०२१ मध्ये नमूद सर्व अटी व शर्तींची पूर्तता करण्याची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांची राहील.**

६. यावर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र. सी-०५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१, पुनर्वसन, २०२, इतर पुनर्वसन योजना, (०५), (०५) (०१) वेठबिगार पुनर्वसन योजना (केंद्रीय क्षेत्र योजना- १००% केंद्र सहाय्यित योजना) (२२३५ डी ५६२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दि. १७.०४.२०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. २९६/व्यय-१०, दि. ०२.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०८२०१२२४१३४८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI
JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2024.08.20 12:39:29 +05'30'

**( संजय जगताप )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)

२) महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)

३) विभागीय आयुक्त, कोकण/नाशिक/पुणे/छत्रपती संभाजीनगर/अमरावती /नागपूर

४) जिल्हाधिकारी, ठाणे/ पालघर/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग/ अहमदनगर/ धुळे/ जळगाव/ नंदुरबार/ सोलापूर/ कोल्हापूर/ सांगली/ सातारा/ छत्रपती संभाजीनगर/ बीड/ जालना/ परभणी/ हिंगोली/ लातूर/ अमरावती/ अकोला/ वाशिम/ बुलढाणा/ यवतमाळ/ नागपूर/ वर्धा/ भंडारा/ गोंदिया/ गडचिरोली/ चंद्रपूर

५) सहसचिव तथा वित्तीय सल्लागार, मदत व पुनर्वसन उपविभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पालघर/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग/ अहमदनगर/ धुळे/ जळगाव/ नंदुरबार/ सोलापूर/ कोल्हापूर/ सांगली/ सातारा/ छत्रपती संभाजीनगर/ बीड/ जालना/ परभणी/ हिंगोली/ लातूर/ अमरावती/ अकोला/ वाशिम/ बुलढाणा/ यवतमाळ/ नागपूर/ वर्धा/ भंडारा/ गोंदिया/ गडचिरोली/ चंद्रपूर

७) महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२

८) महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय,मुंबई ३२.

९) निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.